अखिल भारतीय सेवा (कार्यमुल्याकंन अहवाल) नियमावली , २००७ नुसार भा.व.से. अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यांकन अहवाल लिहिण्याच्या दृष्टीने संबंधित अधिकाऱ्यांसाठी उद्दीष्टये ठरवून देणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : एफडीसी-२०१४/प्र.क्र.१३७/फ-५**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०२ जून, २०१५

**शासन परिपत्रक :-**

अखिल भारतीय सेवा (कार्यमुल्यांकन अहवाल) नियमावली, २००७ नुसार भा.व.से. अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यांकन अहवाल लिहिण्याच्या दृष्टीने वर्षाच्या सुरूवातीस संबंधित अधिकाऱ्यांसाठी उद्दिष्टये ठरवून देणे आवश्यक असतात. सन २०१५-१६ करीता अधिकाऱ्यांना दिलेली उद्दिष्टये विहित वेळेत साध्य होतील याद्दष्टीने पुढील कालावधीसाठी खालीलप्रमाणे उद्दिष्ट्ये निर्धारीत करण्यात येत आहे. सदर उद्दिष्ट्ये साध्य करण्यासाठी खालील विवरणपत्रात नमुद केलेला कालावधी हा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) व प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांच्या सहमतीने निश्चित करण्यात आला असून सदर उद्दिष्ट्ये साध्य न होण्याच्या स्थितीत संबधित अधिकाऱ्यांच्या कार्यमुल्यांकन अहवालावर प्रतिकुल शेरे नोंदविणे भाग पडेल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

| अ.क्र. | अपेक्षित कार्यवाही / उद्दिष्ट्ये | कालमर्यादा | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | राज्यात वनआच्छादीत क्षेत्रात ३३ टक्के पर्यंत वाढ करणे. (६५,६७५ हे. क्षेत्रावर रोपवन करणे) | ३१/०३/२०१६ | १)प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.<br>२)प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>३)व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर.<br>४)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.<br>५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व |
| २ | शामाप्रसाद मुखर्जी जनवन योजना, १५० बफर झोन गावांमध्ये राबविणे. (१५० गावे) | ३१/०३/२०१६ | १)प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.<br>२)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), पूर्व नाशिक/ पश्चिम मुंबई<br>३) मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, मेळघाट / ताडोबा-अंधारी / पेंच /सहयाद्री व्याघ्र प्रकल्प<br>४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) अमरावती |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | ५)वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, नवेगांव-नागझीरा व्याघ्र प्रकल्प |
| ३ | सर्व वनरक्षकांना रोपवनाचे संनियंत्रण करण्यासाठी PDA पुरविणे. (२२०० PDA) आणि वन्यजीव नुकसान भरपाईकरीता अनुदान<br>(अ) २२०० PDA पुरविणे<br>(ब) रोपवन डाटा upload करणे (६५,६७५ हे.)<br>(क)वन्यजीव नुकसानाची प्रकरणांची online नोंद करणे. (१००%) | ३१/०३/२०१६ | १)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (माहिती तंत्रज्ञान व धोरण), नागपूर.<br>२)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प नियोजन व विकास) नागपूर<br>३)मुख्य वनसंरक्षक, {(प्रादेशिक) / (वन्यजीव)} (सर्व) |
| ४ | १.बोर,<br>२.मानसिंगदेव<br>३.कोका,<br>४.कोयना,<br>५.भिमाशंकर,<br>६.अनेरडॅम अभयारण्य या सर्व वन्यजीव अभयारण्याच्या अधिसुचना अंतिम करणे. (सहा संरक्षित क्षेत्र) तसेच संरक्षित क्षेत्राच्या अधिसुचनेचा मसुदा शासनास सादर करणे. | ३१/०३/२०१६ | १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव ) पुर्व नागपूर / पश्चिम मुंबई, / नाशिक.<br>२) मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पुणे.<br>३)मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प / सहयाद्री व्याघ्र प्रकल्प<br>४) वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझीरा व्याघ्र प्रकल्प<br>५)वनसंरक्षक (वन्यजीव ) नाशिक |
| ५ | मानव व वन्यजीव यांच्यातील संघर्ष कमी करण्यासाठी संरक्षीत क्षेत्रापैकी ६ गावांचे (१.चुनखेडी, अंबाबरवा अभयारण्य २.आडोशी, ३.माडोशी, ४.खिरखिंडी, ५.कुशापुर व ६.रावंडी) पुनर्वसन करणे. | ३१/०३/२०१६ | १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.<br>२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव ) पूर्व नागपूर / पश्चिम मुंबई<br>३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.<br>४) मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक , मेळघाट व्याघ्र प्रकल्प / सहयाद्री व्याघ्र प्रकल्प |
| ६ | स्थानिक रहिवाशांच्या उपजिविकेसाठी ३0 Home Stay Tourism योजनेस चालना देणे. | ३१/०३/२०१६ | १)मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प /पेंच व्याघ्र प्रकल्प / सहयाद्री व्याघ्र प्रकल्प<br>२)मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ) पुणे<br>३)वनसंरक्षक (वन्यजीव) ठाणे. |
| ७ | वनसंरक्षणाचे बळकटीकरण व वनांचे आगीपासून संरक्षण<br>(I) GIS आधारीत वनवनव्याचे संनियंत्रण करणे (१०० टक्के) | ३१/०३/२०१६ | १)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संरक्षण) / अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, तथा केंद्रस्थ अधिकारी / कॅम्पा<br>२) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | F.C.A. प्रस्तावाचे संनियंत्रण<br>(I) GIS आधारीत पर्यायी वनीकरणाचे संनियंत्रण करणे<br>(१०० टक्के)<br><br>(II) वनसंवर्धन अधिनियम अंतर्गत वळती केलेले वनक्षेत्राचे GIS आधारीत संनियंत्रण करणे<br>(१०० टक्के) | ३१/०३/२०१६ | १)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संरक्षण) / अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, तथा केंद्रस्थ अधिकारी / कॅम्पा<br>२) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व |
| ९ | वनजमीनींच्या अभिलेखांचे व नकाशाचे Digitization करणे.<br>(I) फॉर्म नं. १ अदयावत करणे व online upload करणे.<br>(७५ टक्के) | ३१/०३/२०१६ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर. |
| १० | वनरक्षकांच्या PDA वर नियत क्षेत्राचा अभिलेख upload करणे.<br>( ६४५० PDAs) | ३१/०३/२०१६ | १)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (माहिती तंत्रज्ञान व धोरण), नागपूर<br>२) मुख्य वनसंरक्षक, भूमी अभिलेख नागपूर.<br>३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) /(वन्यजीव) सर्व |

हे आदेश तात्काळ प्रभावाने अंमलात येतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१५०६०२१३५१२४३८१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानूसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.06.02 13:52:20 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, रॉवेल प्लाझा, कडबी चौक, नागपूर.

४. महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. प्रधान सचिव (वने) यांचे स्विय सहायक, महसूल व वनविभाग, मंत्रालय मुंबई.

७. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर कार्यालयातील सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.

८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव) पुर्व नागपूर.

९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव) पश्चिम मुंबई.

१०.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव) नाशिक.

११.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.

१२.मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ) सर्व.

१३.मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प / पेंच व्याघ्र प्रकल्प / सहयाद्री व्याघ्र प्रकल्प / मेळघाट व्याघ्र प्रकल्प.

१४. मुख्य वनसंरक्षक (भूमि अभिलेख कक्ष ) नागपूर

१५. वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, नवेगाव नागझीरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.

१६. वनसंरक्षक (वन्यजीव ) नाशिक / ठाणे.

१७. उपवनसंरक्षक (सर्व).

१८. सर्व कार्यासने, महसूल वन वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.

१९. निवड नस्ती (फ-५).